**महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात आस्थापनेवरील खर्चाच्या बाबीकरिता योजनेतर मंजूर तरतूदीतून खर्चासाठी प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: उसाअ २०१८/प्र.क्र ३२/उर्दू अकादमी/का.५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०२/०१/२०१९.

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: इयुए १०७५/ एल-जेजे, दि.१६/०४/१९७५.
२) अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक उसाअ-२०१६/ प्र.क्र.६ (सुधा.१)/का.४, दि.०५.१०.२०१६.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२.४.२०१८.

**प्रस्तावना:-**

राज्यात उर्दू भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारीक आदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात होणाऱ्या आस्थापनेवरील खर्चाच्या बाबीकरिता रु.२०,००,०००/- (अक्षरी रुपये- वीस लाख फक्त) इतकी योजनेतर तरतूद मंजूर करण्यात आलेली असून वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३, दि ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार मंजूर तरतुदीच्या ७०% इतक्या मर्यादेत रु.१४,००,०००/- (अक्षरी रुपये- चौदा लाख फक्त) इतका निधी खर्च करण्यास उपलब्ध आहे. उर्दू अकादमी मार्फत कार्यालयीन खर्च, अशासकीय सदस्यांचे प्रवास व दैनिक भत्ते, कार्याध्यक्ष यांचे मानधन, बैठकीसाठी अल्पपोहार इत्यादि कामकाजासाठी मंजूर तरतुदीच्या ७०% म्हणजे रु. १४.०० लाख पैकी माहे जानेवारी, २०१९ ते ३१ मार्च, २०१९ या कालावधीसाठी रु. ३.०० लाख निधीची आवश्यकता आहे. सबब, सदर उपलब्ध निधीतून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या आस्थापनेवरील खर्चाच्या बाबीसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात योजनेत्तर मंजूर रु.२०,००,०००/- (अक्षरी रुपये- वीस लाख फक्त) इतक्या तरतूदीतून वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकानुसार ७०% च्या मर्यादेत उपलब्ध रु.१४,००,०००/- (अक्षरी रुपये- चौदा लाख फक्त) पैकी रु. ३,००,०००/- (अक्षरी रुपये- तीन लाख फक्त) इतक्या निधीतून अकादमीने प्रस्तावित केल्यानुसार माहे जानेवारी, २०१९ ते ३१ मार्च, २०१९ या कालावधीसाठी पुढीलप्रमाणे खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **उद्दीष्ट** | **सन २०१८-१९ या वर्षाकरिता प्रस्तावित रक्कम (रुपये)** |
|---|---|---|
| १. | कार्यालयीन खर्च | ५०,०००/- |
| २. | कार्याध्यक्ष व इत्तर सदस्यांना प्रवास व दैनिक भत्ते खर्च | ५०,०००/- |
| ३. | कार्याध्यक्षांना मानधन | ५०,०००/- |
| ४. | बैठकीच्या वेळी अल्पोपहार/ चहा/ कॉफी | ५०,०००/- |
| ५. | अकादमी कार्यालयातील दुरुस्ती/ वातानुकूलित यंत्र बसविणे/ रंगरंगोटी करणे | ५०,०००/- |
| ६. | उर्दू अकादमीच्या विविध योजनांची उर्दू वर्तमानपत्रांमध्ये जाहिरात देवून अर्ज मागविणे | ५०,०००/- |
| | **एकूण** | **३,००,०००/-** |

२. सदरहू रक्कम "मागणी क्र. झेडई १, २२०५ कला व संस्कृती, १०२-कला व संस्कृती प्रचालन, (००) (०१) उर्दू अकादमीची आस्थापना/ दत्तमत, ३१ सहायक अनुदान (योजनेत्तर) (२२०५ ३०२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यास यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०२१३३५०८२७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2019.01.02 17:23:57 +05'30'

**( म.स.चौकेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (का.७),/ (का.५) / (का.२) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
६. अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
७. निवड नस्ती (महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.).